ऊस पिकाखालील क्षेत्र सूक्ष्म सिंचनाखाली आणण्यासाठीच्या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: सुसिंयो-२०१७/प्र.क्र.५८/१४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: १२ सप्टेंबर, २०१८.

संदर्भ:

**शासन निर्णय क्रमांक: सुसिंयो-२०१७/प्र.क्र.५८/४अे, दि.२४ जुलै, २०१७.**

प्रस्तावना :-

दि, २४ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये "ऊस पिकाखालील क्षेत्र सुक्ष्म सिंचनाखाली आणण्याची योजना" राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत शेतकऱ्यांना दयावयाची कर्ज मर्यादा प्रति हेक्टरी रु. ८५,००० एवढी निश्चित करण्यात आली आहे. नाबार्डकडून दिर्घ मुदत ग्रामीण मुलभूत सुविधा निधीमधून घेण्यात येणाऱ्या (Long Term Rural Infra Fund - LTRF) व्याजाचा दर ५.५०% एवढा निश्चित करण्यात आला आहे. त्यावर राज्य शिखर बँक व जिल्हा मध्यवर्ती शिखर बँक यांच्याकडून आकारण्यात येणारा अधिभार विचारात घेवून साखर कारखाना- १.२५%, शेतकरी - २% व राज्य शासन - ४% याप्रमाणे व्याजाचे दायित्व निश्चित करण्यात आले आहे.

शेतकऱ्यांना द्यावयाच्या प्रति हेक्टरी कर्जाची मर्यादा, त्यावेळी सुक्ष्म सिंचन योजनेंतर्गत ऊस पिकासाठी केंद्र शासनाने निश्चित केलेल्या खर्च मर्यादेच्या मापदंडानुसार विचारात घेण्यात आली होती. तथापि, सुक्ष्म सिंचन साहित्याच्या किंमतीमध्ये होणाऱ्या चढ- उतारानुसार केंद्र शासनाकडून खर्चाच्या मापदंडामध्ये बदल करण्यात येतो. त्यानुसार, या योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या कर्जाच्या रक्कमेमध्ये सुध्दा बदल करणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे, नाबार्डकडून दिर्घ मुदत ग्रामिण मुलभूत सुविधा निधीमधून (Long Term Rural Infra Fund - LTRF) घ्यावयाच्या कर्जाच्या व्याजाचा दर प्रचलित दरानुसार निश्चित करण्यात आला होता. सदर व्याज दर विचारात घेवून व्याजाच्या दायित्वाची विभागणी निश्चित करण्यात आली आहे. नाबार्डकडून देण्यात येणाऱ्या दिर्घ मुदत ग्रामीण पायाभुत सुविधा निधीच्या व्याजाच्या दरामध्ये बदल होत असतात. सदर बदलेल्या व्याज दरानुसार शेतकऱ्यांना कर्ज उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे व त्याप्रमाणात होणाऱ्या शासनाच्य दायतिवामध्ये बदल होणे अपेक्षित आहे.

या बाबीं विचारात घेवून शेतकऱ्यांना द्यावयाच्या प्रति हेक्टरी कर्जाची मर्यादा, शेतकऱ्यांना उपलब्ध करुन द्यावयाच्या कर्जाच्या व्याजाचा दर व राज्य शासन, साखर कारखाने व शेतकरी यांनी सोसावयाचे व्याजाचे दायित्व याबाबतचे संदर्भाधीन शासन निर्णयातील अनुकमे परिच्छेद क्र. ५,७ व ८ वगळून त्याऐवजी सुधारीत तरतूदी करण्याचा प्रस्ताव शासनच्या विचाराधीन होता. अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**<u>शासन निर्णय:-</u>**

१. संदर्भाधीन दि. २४ जुलै, २०१७ च्या शासन निणर्यातील परिच्छेद क्र.५,७ व ८ वगळण्यात येत आहेत.

२. या योजनेंतर्गत "केंद्र शासनाच्या योजनेंतर्गत ऊस पिकाच्या सूक्ष्म सिंचनासाठी मंजूर असलेल्या मापदंडानुसार (cost norms) अनुज्ञेय खर्चाच्या" मर्यादेत शेतकऱ्यांना सवलतीच्या दराने पाच वर्षाच्या कालावधीसाठी कर्ज उपलब्ध करुन देण्यात येईल.

३. नाबार्डकडून घेण्यात येणाऱ्या कर्जाचे वाटप शेतकऱ्यांना राज्य सहकारी शिखर बँक, जिल्हा मध्यवती बँक या कर्ज साखळीतून करण्यात येईल. त्यासाठी व्याजाची आकारणी खालीलप्रमाणे करण्यात येईल.

| अ. क्र. | संस्था | व्याजाचा दर |
|---|---|---|
| १. | नाबार्डकडून राज्य सहकारी शिखर बँकेस कर्ज | त्या त्या वर्षात दिर्घ मुदत ग्रामिण मुलभूत सुविधा निधीसाठी लागु असलेला व्याज दर (Long Term Rural Infra Fund - LTRF) |
| २. | राज्य शिखर बँकेने जिल्हा मध्यवर्ती बँकाना कर्ज | नाबार्ड कडून प्राप्त होणाऱ्या कर्जावर ०.५% अधिभारासह |
| ३. | जिल्हा मध्यवर्ती बँकानी शेतकऱ्यांना कर्ज | मध्यवर्ती बँकेकडून प्राप्त होणाऱ्या कर्जावर १.२५% अधिभारासह. |

४. सदर कर्जाचे नियमित व्याज अदायगीचे दायित्व राज्य शासन, साखर कारखाना व शेतकरी यांच्यामध्ये खालील प्रमाणे असेल:-

साखर कारखाना - १.२५%

शेतकरी - २%

राज्य शासन - त्या त्या वर्षात दिर्घ मुदत ग्रामीण पायाभूत सुविधा कर्ज निधीच्या (LTRF) लागू असलेल्या दरानुसार उर्वरित व्याजाचे दायित्व.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१२१६१०२२७१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.09.12 16:14:07 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. मंत्री (कृषी), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२

३. मा. मंत्री (सहकार), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. मंत्री (जलसंपदा), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा. राज्यमंत्री (कृषी), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा. राज्यमंत्री (सहकार), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
७. मा. राज्यमंत्री (जलसंपदा), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
९. अ. मु. स. (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
१०.अ. मु. स. (नियोजन), नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
११.अ. मु. स. (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
१२.आयुक्त कृषि , कृषि आयुक्तालय, महाराष्ट राज्य पुणे.
१३.साखर आयुक्त, साखर संकुल, शिवाजी नगर, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.मुख्य महाव्यवस्थापक,नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड,शिवाजी नगर, पुणे.
१५.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे (१० प्रतीसह)
१६.सर्व संचालक/सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट राज्य पुणे.
१७.सर्व विभागीय कृषी सह संचालक,
१८. सर्व विभागीय आयुक्त,
१९.सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास मंडळ,
२०.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२१.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
२२.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
२३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२४.सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
२५.महासंचालक माहिती व जनसंपर्क सचालनालय,मुंबई.
२६.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
२७.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर
२८. सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कार्यासन अधिकारी, (कृषि) कृषि व पदुम विभाग
२९.वित्त विभाग व्यय १/अर्थसंकल्प १३, मंत्रालय, मुंबई -३२
३०.नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई - ३२,
३१.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
३२.मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३३.निवड नस्ती.